“जागतिक वारसा दिन व जागतिक संग्रहालय दिन” यानिमित्त परिसंवाद आयोजनास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संग्रह-२०२५/प्र.क्र.१०२/सां.का.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २६ मे, २०२५

**वाचा :-** संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांचे पत्र क्र. छा.शा/११ २०२५-२६/ परिसंवाद/७२६/सां.का.३, दि.१९.०५.२०२५.

**प्रस्तावना :-**

“जागतिक वारसा दिन व जागतिक संग्रहालय दिन” यानिमित्त पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई येथे परिसंवादाचे आयोजन करण्यात येणार आहे. सदर परिसंवादाकरीता ऐतिहासिक वारसा, संग्रहालय याविषयी राष्ट्रीय स्तरावरील ०२ अभ्यासक व कोकणातील कातळशिल्प यासंबंधी अभ्यासक व इतिहासप्रेमींना निमंत्रित करण्यात येणार आहे. या परिसंवादाच्या आयोजनाकरीता येणाऱ्या ₹९,७७,८९०/- इतक्या रकमेस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत संचालनालयाने उपर्निर्दिष्ट पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. यानुसार सदर प्रयोजनार्थ प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“जागतिक वारसा दिन व जागतिक संग्रहालय दिन” यानिमित्त पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई येथे परिसंवादाचे आयोजन करण्यासाठी येणाऱ्या ₹९,७७,८९०/- (अक्षरी रुपये नऊ लक्ष सत्याहत्तर हजार आठशे नव्वद मात्र) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय विअप्र-२०१३/प्र.क्र.२०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) “अ” नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग मागणी क्र. झेडडी-२, २२०५ (०१) (०२) पुरातत्व संचालनालय अन्वेषण, उत्खनन, संशोधन, संवर्धन व इतर खर्च (अनिवार्य) (२२०५ १३३८) ५०-इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२५/ प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि.७ एप्रिल, २०२५ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०५२६१४४२१०९९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARSRAM NANDRAM BAHURE

Digitally signed by PARSRAM NANDRAM BAHURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ef62741544bc4d8832eecfb2b7ea295e8a6fcdfe9faffcfda201c87e1c73881b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5FD2A6873F4AE5B1D9EA7DD52E449E02A942EA90145BAEAB72C63CED6D659844, cn=PARSRAM NANDRAM BAHURE
Date: 2025.05.26 14:43:20 +05'30'

**( परसराम नं. बहुरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उपसचिव (सां.का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवड नस्ती, सां.का.३.